उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग उप संचालक (तां.) गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या सन २०१५

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- ईएसटी-३४१५/प्र.क्र.७०/उद्योग-३**
**मंत्रालय मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ०३ जून, २०१५.**

वाचा :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५

२) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.आस्थापना/रापअ/उससं/सर्व बदल्या २०१५/९३,दि. १२.०५.२०१५.

**शासन आदेश :-**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग उप संचालक (तां.) (गट-अ) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालीक बदल्या खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत.

**उद्योग उप संचालक (गट-अ)**

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सद्याची पदस्थापना | प्रस्तावित पदस्थापनेचे ठिकाणी | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.प्र.द.रेदांळकर, उद्योग उप संचालक (तांत्रिक) | उद्योग संचालनालय, मुंबई | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, परभणी | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर बदली |
| २. | श्री.सु.रा.लोंढे उद्योग उप संचालक (तांत्रिक) | उद्योग संचालनालय, मुंबई | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, रायगड | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर बदली |
| ३. | श्री.प.गं.राठोड उद्योग उप संचालक (तांत्रिक) | मुंबई प्राधिकरण विभाग, चुनाभट्टी, मुंबई | उद्योग उप संचालक (तांत्रिक), उद्योग संचालनालय, मुंबई | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर बदली |
| ४. | श्री.सं.अ.भामरे, महाव्यवस्थापक | जिल्हा उद्योग केंद्र, धुळे | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर बदली |

२. बदली झालेल्या अधिकाऱ्याचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक अंतिम वेतन प्रमाणपत्र तात्काळ नवीन कार्यालयाकडे पाठविण्याबाबत सूचना देण्यात याव्यात.

३. संबंधीत अधिकाऱ्याची शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये तसेच म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० सी नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नसल्याच्या सूचना देण्यात याव्यात.

४. संबंधीत अधिकाऱ्यांनी केलेल्या विनंतीनुसार सदर बदल्या करण्यात येत असल्याने त्यांना बदलीच्या अनुषंगाने भत्ते व पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०३१५५१०५६२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rekha Vijay Katam

Digitally signed by Rekha Vijay Katam
DN: CN = Rekha Vijay Katam, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industries Energy & Labour
Date: 2015.06.03 16:33:46 +05'30'

**( रेखा काटम )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई

**प्रत**

१) मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
३) महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी
६) सर्व संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी,
७) विभागीय कार्यालय, औरंगाबाद/नाशिक/ ठाणे
८) जिल्हा उद्योग केद्र, परभणी/रायगड/अहमदनगर
९) सर्व संबंधीत अधिकारी
१०) निवडनस्ती (उद्योग-३)